**भूसंपादन रत्नागिरी**
न्युक्लिअर पॉवर कॉर्पोरेशन ऑफ इंडिया लि. या कंपनीच्या जैतापूर अणुऊर्जा प्रकल्पाबाबत संपादित जमिनीचा वाढीव मोबदला देण्यासंदर्भात समिती गठित करणेबाबत :-

**महाराष्ट्र शासन**
**महसूल व वन विभाग**
**शासन निर्णय क्रमांक :- विकाक-२०१०/प्र.क्र.१२/अ-४**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२**
**दिनांक :- २० डिसेंबर, २०१०**

**प्रस्तावना :-**

जैतापूर येथील ९९०० मे.वॅट क्षमतेचा अणुऊर्जा प्रकल्पासाठी रत्नागिरी जिल्हयातील ५ गावांतील एकूण ९३८-०२-६० हेक्टर जमीन भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या तरतुदीनुसार संपादित करण्याची कार्यवाही पूर्ण करण्यात आली आहे. संपादित केलेल्या जमिनीसंदर्भातील निवाडे सन २००९ मध्ये जाहीर करण्यात आले आहेत. संपादित जमिनीचा ताबा संपादन संस्था न्युक्लिअर पॉवर कॉर्पोरेशन ऑफ इंडीया लि. यांच्याकडे दिनांक २२.१.२०१० रोजी सुपूर्द करण्यात आला आहे. निवाडयानुसार देय असलेले नुकसान भरपाई मोबदला संपादक संस्थेने संबंधित भूसंपादन अधिकारी यांचे कार्यालयाकडे जमा केलेला आहे. मोबदल्याच्या रक्कमा अदा करण्यासंदर्भात पत्र दिले असून देखील अद्याप ब-याचशा जमीन मालकांनी मोबदला स्विकारल्या नसल्याचे दिसून आले आहे. तसेच काही शेतक-यांनी संपादित जमिनीसाठी वाढीव मोबदला मिळण्याबाबत मागणी केली आहे. तथापि भूसंपादन कायदा १८९४ च्या कलम १८ अन्वये भूसंदर्भाची प्रकरणे शेतकऱ्यांनी/जमीन मालकांनी मुदतीत दाखल केली नसल्याने आता त्याप्रमाणे कार्यवाही करणे शक्य होत नाही, अशा परिस्थितीत ज्यांच्या जमिनी गेल्या आहेत अशा शेतकऱ्यांचे व जमीन मालकांचे नुकसान होणे संभवते.

मा.मंत्री (जलसंपदा व उर्जा) यांच्याकडे दि. ३.८.२०१० रोजी आयेजित केलेल्या बैठकितील इतिवृत्तामध्ये असे नमुद करण्यात आले आहे की, विधानमंडळाच्या सन २०१० मध्ये पार पडलेल्या पावसाळी अधिवेशनात सदर प्रकल्पासंदर्भात तारांकित प्रश्न उपस्थित करण्यात आला होता. त्यावेळी चर्चेच्या दरम्यान निवाडयामध्ये देण्यात आलेला मोबदला अत्यल्प असल्याने वाढीव दराने मोबदला देण्याबाबत शासन कार्यवाही करेल, असे आश्वासन सभागृहात देण्यात आले आहे. तसेच सदर प्रकल्पास स्थानिक लोकांचा पाठिंबा असणे फार महत्वाचे असल्यामुळे, सदर बैठकीमध्ये जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांच्या अध्यक्षतेखाली संपादित जमिनीसाठी वाढीव मोबदला व भरपाई ठरविण्यासाठी एक समिती स्थापन करण्याचे ठरविण्यात आले. त्याबाबत शासन व संपादक संस्था यांच्यामध्ये दिनांक १६.१०.२०१० रोजी झालेल्या करारनाम्यामध्ये क्रमांक-२८ वर पुनर्वसन योजना नमूद करण्यात आलेली आहे. त्यानुसार प्रकल्पग्रस्तांना जमिनीचा वाढीव मोबदला व भरपाई देण्यासंदर्भात जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांच्या अध्यक्षतेखाली एक समिती गठित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती. त्याबाबत सांगोपांग व सर्वंकष विचार करुन शासन पुढीलप्रमाणे निर्णय घेत आहे.

**शासन निर्णय :-**

न्युक्लिअर पॉवर कॉर्पोरेशन ऑफ इंडीया लि. (एन.पी.सी.आय.एल.) हा भारत सरकारच्या अणुऊर्जा विभागाचा अंगिकृत उपक्रम आहे. सदर उपक्रमाकडून रत्नागिरी जिल्हयातील राजापूर तालुक्यात मौजे माडबन व इतर चार गावातील जमीन संपादित करुन जैतापूर हा अणुऊर्जा प्रकल्प उभारण्यात येत आहे. सदर प्रकल्प हा देशातील सर्वात मोठा अणुऊर्जा प्रकल्प असून त्यामुळे उर्जा निर्मितीमध्ये मोठया प्रमाणात वाढ होणार आहे. सदर प्रकल्पासाठी ज्या शेतक-यांच्या जमिनी संपादित करण्यात आल्या आहेत, त्या सर्व शेतक-यांच्या संपादित जमिनीसाठी संपादन संस्थेतर्फे वाढीव मोबदला व भरपाई रक्कमा ठरविण्यासाठी जिल्हाधिकारी, रत्नागिरी यांचे अध्यक्षतेखाली खालीलप्रमाणे समिती गठित करण्यात येत आहे.

| अ.क्र. | नाव | पद |
|---|---|---|
| १ | जिल्हाधिकारी, रत्नागिरी | अध्यक्ष |
| २ | मुख्य कार्यकारी अधिकारी, एन.पी.सी.आय.एल.यांनी नेमणूक केलेले २ वरिष्ठ अधिकारी | सदस्य |
| ३ | उप संचालक, नगररचना (कोकण विभाग) | सदस्य |
| ४ | उपायुक्त, विभागीय आयुक्त, कोकण विभाग यांचे कार्यालय | सदस्य |
| ५ | उप जिल्हाधिकारी (भूसंपादन), जिल्हा रत्नागिरी | सदस्य सचिव |

**समितीची कार्यकक्षा :-**

उपरोक्त प्रमाणे गठित केलेल्या समितीची कार्यकक्षा खालीलप्रमाणे राहील.

**१)** एन.पी.सी.आय.एल. साठी जैतापूर अणुऊर्जा प्रकल्पासाठी संपादित जमिनीच्या संदर्भात संबंधित शेतकरी /जमीन मालक यांना वाढीव मोबदला व भरपाई सानुग्रह अनुदानाच्या स्वरुपात ठरविण्यात यावी.

**२)** जैतापुर अणुऊर्जा प्रकल्पासाठी ज्या ज्या शेतक-यांची / जमीन मालकांची जमीन संपादित करण्यात आली आहे, अशा सर्व हितसंबंधितांचे म्हणणे समितीसमोर मांडण्याची पुरेशी संधी देण्यात यावी.

**३)** जैतापूर अणुऊर्जा प्रकल्पासाठी संपादित केलेल्या जमिनीसाठी भूसंपादन अधिनियम, १८९४ च्या कलम ११(१) नुसार जाहीर केलेल्या निवाडा रक्कमेव्यतिरिक्त समितीने सानुग्रह अनुदानाची रक्कम निश्चित करावी.

**४)** समितीने हितसंबंधित व्यक्तींना सानुग्रह अनुदानाचे प्रमाण निश्चित करताना प्रकल्पाच्या जागेसभोवतालचे सध्याचे दर काय आहेत, या संदर्भातील उपलब्ध असलेले व सादर केलेले पुरावे गुणवत्तेनुसार तपासावे व त्यानुसार वाढीव दर निश्चित करावेत.

**५)** सानुग्रह अनुदानाचे प्रमाण निश्चित करण्याबाबतचा समितीचा निर्णय सर्वांना बंधनकारक राहील.

**६)** समितीने सानुग्रह अनुदानाचे प्रमाण निश्चित केल्यानंतर सदरचा प्रस्ताव राज्य शासनामार्फत केंद्राच्या अणुऊर्जा विभागास पुनर्विचारार्थ पाठविण्यात यावा.

**७)** याकरीता आवश्यक असणारा निधी न्युक्लिअर पॉवर कॉर्पोरेशन ऑफ इंडीया लि. तर्फे उपलब्ध करुन घेण्यात यावा.

**८)** उपरोक्तप्रमाणे सर्व कार्यवाही अंतिम झाल्यानंतर राज्य शासनाच्या अंतिम मान्यतेने संबंधितांना सानुग्रह अनुदानाची रक्कम वितरीत करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

सही/-

**(सीताराम कुंटे)**

प्रधान सचिव,

महाराष्ट्र शासन

**प्रति,**

मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मंत्रालय,मुंबई-३२

प्रधान सचिव (वने), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२

प्रधान सचिव (वित्त विभाग,) मंत्रालय , मुंबई-३२

प्रधान सचिव (महसूल), महसूल व वन विभाग, मंत्रालय , मुंबई-३२

प्रधान सचिव (उर्जा), उद्योग, उर्जा व कामगार विभाग, मंत्रालय ,मुंबई-३२

प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय ,मुंबई-३२

विभागीय आयुक्त, कोंकण विभाग.

जिल्हधिकारी,रत्नागिरी.

उपसचिव (पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२,

उपजिल्हाधिकारी (भूसंपादन), कोंकण रेल्वे क्रमांक २, रत्नागिरी.

प्रकल्प संचालक (जे.एन.पी.सी.), न्युक्लिअर पावर कॉर्पोरेशन ऑफ इंडिया लि., २ रा मजला, नाभिकीय ऊर्जा भवन, अणुशक्तीनगर, मुंबई- ४०००९४

कार्यासने अ-१, अ-२, अ-३, महसूल व वन विभाग.

निवड नस्ती (अ-४), महसूल व वन विभाग.